प्राचीनकाळीं ग्रीसदेशांत डेल्फास नामक देवलयावर Know Thyself [ स्वतःला जाण ] असें वाक्य लिहिलें होतें' त्याचें त्यावेळीं मोठमोठ्या पंडितांनाही गूढ पडलें होतें. "आत्मावाऽऽरे द्रष्टव्यः" ह्या आमच्या औपनिषद वाक्याची त्यांना ओळख झाली असती, तर त्यांच्या अंतःकरणांत ताबडतोब प्रकाश पडून आज शेंकडों वर्षें युरोपखंड जें अज्ञानांधकारांत चांचपडत आहे तें तसें खचित राहिलें नसतें. असो; झाली गोष्ट परत येत नाहीं. 'सत्यमेव जयते' हा सिद्धांत अबाधित असल्यामुळें कधीं तरी सर्व पृथ्वीवरील लोकांना सत्स्वरूप परब्रह्माची ओळख होईल ह्यांत शंका नाहीं. मात्र सहजवृत्त्या ती होण्यापेक्षां आम्हीं हिंदुलोकांनीं ती करून देणें ह्यांत आमचा विशेष पुरुषार्थ आहे. रोमनलोकांनीं ग्रीसदेश जिंकला तरी ग्रीकाविद्येचा पगडा रोमनलोकांवर बसला; त्याचप्रमाणें हिंदुस्थानदेश सध्यां जरी परकीयाच्या ताब्यात गेला असला, तरी तेणेंकरून हिंदुधर्माची युरोपांत छाप बसण्याला हरकत येणार नाहीं. इंग्रज लोकांनीं आमचीं शरीरेंच फक्त जिंकलीं आहेत; पण आपणास सर्व युरोपियन व अमेरिकन राष्ट्रांचीं मनें जिंकावयाचीं आहेत हें हिंदुमात्रानें लक्षांत बाळगलें पाहिजे. पण स्वस्थ बसल्यानें हें साध्य व्हावें कसें ? लोकांना उपदेश करण्याची पात्रता येण्यास अगोदर आपली आपणालाच ओळख व्हावयाला नको काय ? दुसऱ्याचें अज्ञान घालवितां येण्यापूर्वीं स्वतःचें अज्ञान जावयाला नको काय ? चंद्रबिंब घेऊं पाहाणाऱ्या बालकाप्रमाणें ईश्वर, आत्मा, मुक्ति इत्यादि अतींद्रिय परमगूढ वस्तूंविषयीं मनुष्यमात्राच्या हृदयांत स्वभावतःच उत्कट जिज्ञासा उत्पन्न होत असते, व तिजपासूनच सर्व धर्मप्रक्रिया व तत्त्वविचार ह्यांचा प्रादुर्भाव होतो. मी कोण आहें, आलों कोठून, जाणार कोठें वगैरे बिकट प्रश्न आयुष्यामध्यें प्रत्येक मनुष्याच्या अंतःकरणांत उद्भवून क्षणभर तरी वैराग्य उत्पन्न करतात.

But for those obstinate questionings
Of sense and outward things,
Fallings from us, vanishings;

Misgivings blank, of a creature
Moving about in worlds not realized.*

ह्या वर्डस्वर्थकवीच्या प्रासादिक वाणीनें ग्रथित केलेल्या विचारांनीं मनुष्यमात्राचें अंतःकरण ग्रस्त झालेलें असतें, व ते ते विचार तो स्वसामर्थ्यानुरूप प्रदर्शितही करीत असतो. ह्या नियमाला अपवाद आढळल्यास तो 'स वै मुक्तोऽथवा पशुः' ह्यांपैकीं एकाद्या कोटींत घालावा लागेल. हल्लीं सर्व प्रकारच्या उदात्त विचारांना फांटा देऊन केवळ उदरपोषणादि देहधर्म उरकण्यांत गढून गेलेले आम्ही हिंदुलोक कोणत्या वर्गांत जाऊं ह्याचा ज्याचा त्यानें विचार करावा. सध्यां आम्ही महानिद्रेंत घोरत पडलों आहों, यांतून केव्हां जागे होऊं तेव्हां खरें.

तात्पर्य, Plain living and high thinking are no more [साधें आचरण व उदात्त विचार हीं समूळ नाहींशीं झालीं] असें जें वर्डस्वर्थकवीनें फार हृदयद्रावक वर्णन केलें आहे तें हल्लींच्या आमच्या स्थितीस पूर्णपणें लागू पडतें.

असो. ह्या सच्चिदानंद ब्रह्मविषयक विचारांत दोन महिने घालवितां आल्यानें आम्हांस परम समाधान वाटत आहे. वाचकांना कंटाळा आला असल्यास तसदी दिल्याबद्दल माफी मागून ही अद्वैतमीमांसाष्टाध्यायी पुरी करतों.




---

* पण ते प्रत्यक्ष व बाह्यवस्तुसंबंधानें फिरफिरून उद्भवणारे प्रश्न, ते वयपरत्वें उत्तरोत्तर विसरत जाणारे पूर्वजन्मार्जित संस्कार, व नष्ट होणाऱ्या वासना, आणि काल्पनिक सृष्टीमध्यें संचार करणाऱ्या जीवाच्या अंतःकरणाला व्यापणारे दुरवगाह्य संशय, हे आम्हाला दिल्याबद्दल मी परमेश्वराचे आभार मानतों.